**आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत आरोग्य सेवक (स्त्री) पदास दुसरा व आरोग्य सहायक (स्त्री) पदास पहिला लाभ देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः डिएसआर २०१७/प्र.क्र. ३६/आस्था-५

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१
तारीख: २९ मार्च, २०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. सेप्रनि-२०१०/प्रक्र ३५९/आस्था-९, दि. ५ डिसेंबर २०१२
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेतन ११०९/प्रक्र ४४/सेवा ३, दि. १ एप्रिल २०१०
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेतन ११०९/प्रक्र ४१/सेवा ३, दि. ५ जुलै २०१०
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेतन ११११/प्रक्र ८/सेवा ३, दि. १ जुलै २०११
५) शासन निर्णय वित्त विभाग क्र. आप्रयो १०१४/प्रक्र २१/सेवा ३, दि. ६ सप्टेंबर २०१४
६) शासन निर्णय वित्त विभाग क्र. आप्रयो १०१४/प्रक्र २१/सेवा ३, दि. १० फेब्रुवारी २०१५
७) शासन निर्णय वित्त विभाग क्र. मप्रन्या १०१५/प्रक्र ९७/सेवा ३, दि. १० डिसेंबर २०१५
८) शासन निर्णय वित्त विभाग क्र. आप्रयो १०१५/प्रक्र १११/सेवा ३, दि. २३ डिसेंबर २०१५
९) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर १२१०/प्रक्र १२४ (भाग-१)/सेवा ९, दि. ९ फेब्रुवारी २०१६

**प्रस्तावना-**

राज्यातील जिल्हा परिषदांमध्ये कार्यरत असलेल्या आरोग्य सेविका व आरोग्य सहायक (स्त्री) यांना यापूर्वीच्या वित्त विभागाच्या दिनांक ८ जून १९९५ च्या शासन निर्णयानुसार १२ वर्षाची सातत्याने सेवा झाल्यानंतर वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ देण्यात येत होता. शासनाने दिनांक १ एप्रिल २०१० च्या शासन निर्णयानुसार राज्यातील सर्व जिल्हा परिषदांना आश्वासित प्रगती योजने अंतर्गत दुसरा लाभ कसा द्यावा, याबाबत वित्त विभागाने मार्गदर्शनपर सूचना दिल्या आहेत.

जिल्हा परिषद आरोग्य विभागाच्या आस्थापनेवर सन २०१२ पूर्वी आरोग्य सेवक व आरोग्य सहायक ही दोन पदे होती. आश्वासित प्रगती योजने अंतर्गत आरोग्य सेवकांना १२ वर्षांची सलग सेवा झाल्यानंतर शासनाच्या दिनांक ८ जून १९९५ च्या शासन निर्णयानुसार वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ दिला जात होता. त्यामध्ये शासन निर्णय दिनांक २० जुलै २००१ अन्वये सुधारणा करण्यात आली. आरोग्य सेवक पदास या शासन निणर्यानुसार वरिष्ठ वेतनश्रेणी म्हणून आरोग्य सहायक पदाची वेतनश्रेणी दिली

जात होती. तर आरोग्य सहायक पदास पदोन्नतीचे वरिष्ठ पद नसल्याने दिनांक ८ जून १९९५ व दिनांक २० जुलै २००१ च्या शासन निर्णयानुसार एकाकी पदाचे लाभ दिले जात होते.

वित्त विभागाच्या दिनांक ५ जुलै २०१० च्या शासन निर्णयानुसार यामध्ये आणखी सुधारणा करुन राज्य शासकीय तसेच जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना २४ वर्षांची सतत सेवा झाल्यानंतर वरिष्ठ वेतनश्रेणीचा दुसरा लाभ अनुज्ञेय ठरविला. आरोग्य सेवकांना १२ वर्षाची सलग सेवा झाल्यानंतर आरोग्य सहायकाची वेतनश्रेणी दिली जात होती. तसेच २४ वर्षाची सलग सेवा झाल्यानंतर त्यांना रु.३२५० (रु.२८००+४५०) ग्रेड पे अनुज्ञेय ठरविला. तसेच आरोग्य सहायकांना १२ वर्षांची सेवा झाल्यानंतर दिनांक ५ डिसेंबर २०१२ पर्यंत आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत पहिला लाभ म्हणून रु.३२५० ग्रेड पे दिला जात होता.

शासनाने दिनांक ५ डिसेंबर २०१२ पासून आरोग्य पर्यवेक्षक पदाची निर्मिती केली आहे. या पदावर पदोन्नतीने नेमणूक करतांना आरोग्य सहायक संवर्गातील पुरुष व महिला कर्मचाऱ्यांना पदोन्नती दिली जाते. यामध्ये पुरुष व महिला आरोग्य सहायकांचे प्रमाण ६७:३३ असे निश्चित करण्यात आले आहे.

म्हणजेच दिनांक ५ डिसेंबर २०१२ पासून आरोग्य सेवकांना २४ वर्षांचा दुसरा लाभ द्यावयाचा झाल्यास नवीन सुधारणेनुसार त्यांना आरोग्य पर्यवेक्षक पदाची वेतनश्रेणी लागू केली जाते. तर आरोग्य सहायकांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत पहिला लाभ देतांना आरोग्य पर्यवेक्षक पदाची वेतनश्रेणी दिली जाते. मात्र दिनांक ५ डिसेंबर २०१२ पूर्वी जे कर्मचारी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत पहिल्या लाभास पात्र झाले आहेत त्यांना पहिला लाभ म्हणून रु. ३२५०/- ग्रेड पे देण्यात येत आहे. म्हणजेच जेष्ठतम आरोग्य सहायकांना १२ वर्षाचा लाभ मिळतांना रु.३२५० ग्रेड पे देण्यात येत आहे तर कनिष्ठ कर्मचाऱ्यांना रु.४२००/- ग्रेड पे देण्यात येत आहे अशी विसंगती निर्माण झाली आहे.

ही विसंगती दूर करण्यासंदर्भात शासनास तक्रारी व निवेदने प्राप्त झाली आहेत. यासंदर्भात वित्त विभागातील सेवा-३ कार्यासनाचे अभिप्राय घेण्यात आले आहेत. त्यानुसार तसेच न्यायालयीन प्रकरण रिट याचिका क्र. ४७४८/२०१६ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक ५ जुलै २०१६ रोजी दिलेला निर्णय पाहता यामध्ये बदल होणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय-**

वरील वस्तूस्थिती पाहता वेतनश्रेणीतील त्रुटी दूर करणे आवश्यक असल्याचे विभागास आढळून आले आहे. त्यामुळे आश्वासित प्रगती योजने अंतर्गत आरोग्य सेवक (स्त्री) यांना दुसरा लाभ देताना तर आरोग्य सहायक (स्त्री) यांना पहिला लाभ देताना त्यात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:

१. आरोग्य सेवक (स्त्री) या पदावर कार्यरत कर्मचाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेचा दुसरा लाभ देतांना आरोग्य पर्यवेक्षक पदाची वेतनश्रेणी /ग्रेड पे सह देय ठरते. हा लाभ त्यांना दिनांक ५ डिसेंबर २०१२ रोजी आरोग्य पर्यवेक्षक पद अस्तित्वात आल्याने त्या तारखेपासून मंजूर करण्यात येत आहे.

२. आश्वासित प्रगती योजने अंतर्गत आरोग्य सहाय्यक (स्त्री) या पदावर कार्यरत कर्मचाऱ्यांना १२ वर्षाचा प्रथम लाभ देतांना दिनांक ५ डिसेंबर २०१२ पासून आरोग्य पर्यवेक्षकाची वेतनश्रेणी / ग्रेड पे सह अनुज्ञेय ठरेल.

३. उपरोक्त लाभ दिनांक ५ डिसेंबर २०१२ पूर्वी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत पहिला अथवा दुसरा लाभ देय झालेल्या आरोग्य सेवक (स्त्री) व आरोग्य सहायक (स्त्री) या पदावरील कर्मचाऱ्यांनाही दिनांक ५ डिसेंबर २०१२ पासून देय असेल.

४. उपरोक्त लाभ देतांना शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १.४.२०१०, ५.७.२०१०, १.७.२०११, ६.९.२०१४, १०.२.२०१५, १०.१२.२०१५, २३.१२.२०१५ तसेच दिनांक ९.२.२०१६ मधील तरतूदींचा यथास्थिती (पदोन्नतीची साखळी असलेली/पदोन्नतीची साखळी नसलेली पदे विचारात घेवून) विचार करुन संबंधितांना त्यांच्या नियमित सेवेची १२ वर्षे / पहिल्या लाभ मंजूरी नंतरच्या १२ वर्षे सेवेनंतर, (संबंधितांना लाभ मंजूर अनुज्ञेय झाल्याच्या तारखेस) पदोन्नतीचे पद उपलब्ध होते / किंवा नव्हते याचा विचार करुन प्रकरणपरत्वे निर्णय घेण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१४५०२३७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Narayan Bhandarkar

Digitally signed by Sandesh Narayan Bhandarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Narayan Bhandarkar
Date: 2017.03.29 17:31:23 +05'30'

**( सं. ना. भंडारकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

२. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव

३. विभागीय आयुक्त (सर्व)

४. जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (सर्व)
५. जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
९. उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई / पुणे / औरंगाबाद / नागपूर / नाशिक / अमरावती
१०. वित्त विभाग / सेवा-३
११. निवड नस्ती / आस्था-५